**यशदा, पुणे येथे जलसाक्षरता केंद्र आणि चंद्रपूर वन प्रशासन विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी, चंद्रपूर, जल व भूमी व्यवस्थापन संस्था (वाल्मी), औरंगाबाद व डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती येथे विभागीय जलसाक्षरता केंद्रे स्थापन करण्याबाबत.(सूधारीत निर्णय)**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
**शासन निर्णय, क्र. जलसा-२०१८/प्र.क्र.३०८/२०१८/सिं.व्य. (महसूल)**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :-१९ सप्टेंबर, २०१८

**संदर्भ:** १) शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१६/(प्र.क्र.०७/२०१६)/लाक्षेवि(आस्था) दि.११ फेब्रुवारी २०१६

२) शासन निर्णय क्र. वाल्मी-२०१६/प्र.क्र.६९/१६ लाक्षवि (आस्था), दि.३० नोव्हेंबर, २०१६

**प्रस्तावना:**

राज्यातील वापरायोग्य पाण्याची उपलब्धता मर्यादित असून गरजेपेक्षा कमी आहे. वाढती लोकसंख्या, वाढते उद्योग व अनियमित पर्जन्यमान यामुळे भविष्यात उपलब्ध पाण्यावरील ताण आणखी वाढणार आहे. उपलब्ध पाणी सर्व वापरकर्त्यांना त्यांच्या गरजेच्या प्रमाणात उपलब्ध होण्यासाठी पाण्याचा वापर अत्यंत काटकसरीने व नियोजनपूर्वक करण्याची आवश्यकता आहे. यासाठी समाजात जलजागृती व जलसाक्षरता निर्माण होण्याची गरज असून त्यादृष्टीने राज्यात राबविण्यात येणा-या जलजागृती सप्ताहास जनतेचा मोठा प्रतिसाद मिळत आहे. त्यानुषंगाने मा. वित्त मंत्री महोदयांनी २०१६ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनामध्ये राज्यात कायमस्वरुपी जलसाक्षरता केंद्र निर्माण करण्याची घोषणा केली आहे. त्याची अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने जलसाक्षरता केंद्राची स्थापना, रचना व कार्यपध्दती याबाबत सविस्तर सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने संदर्भीय दि. ३०.११.२०१६ चा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. जलसाक्षरतेच्या प्रसाराच्या दृष्टीने त्यामध्ये काही अनुषंगिक सुधारणा करून खालीलप्रमाणे सुधारित शासन निर्णय जाहीर करण्यात येत आहे.

**संकल्पना:**

पाण्यासंबंधी काम करण्याऱ्या शासकीय विभागामार्फत राबविल्या जाणाऱ्या विविध योजना जनतेपर्यंत पोहोचविण्यासाठी आणि पाण्याचा वापर नियोजनपूर्वक काटकसरीने करण्यासाठी जनतेचा सक्रीय सहभाग आवश्यक असून त्यादृष्टीने राज्यात कायमस्वरुपी जलजागृती अभियान राबविण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. जलजागृतीसाठी व जलसाक्षरतेसाठी विविध उपक्रम तयार करणे व जनतेपर्यंत पोहोचविण्यासाठी आवश्यक प्रशिक्षण देण्याची व्यवस्था जलसाक्षरता केंद्रामध्ये केली जाईल. जलसाक्षरता उपक्रम

जनतेपर्यंत पोहोचविण्यासाठी राज्यस्तर, विभागस्तर, जिल्हास्तर, तालुकास्तर, व ग्रामस्तरावर अनुक्रमे जलनायक, जलयोद्धा, जलप्रेमी, जलदूत व जलसेवक तसेच शासन स्तरावर कार्यरत किंवा शासन सेवेतून सेवानिवृत्त अधिकारी / कर्मचारी असे जलकर्मी अशा उत्स्फूर्त स्वयंसेवकांची संरचनात्मक फळी निर्माण केली जाईल. राज्यामध्ये राबविल्या जाणाऱ्या जलसाक्षरता उपक्रमांमध्ये समन्वय व सुसंगतपणा ठेवण्यासाठी राज्यस्तर, यशदास्तर, विभागस्तर, जिल्हास्तर, तालुकास्तरावर जलसाक्षरता समन्वय समित्या निर्माण करुन त्यांच्याद्वारे जलसाक्षरतेचा कार्यक्रम राज्यात कायमस्वरुपी राबविला जाईल.

**शासन निर्णय**:

१.० राज्यात यशदा, पुणे येथे कायमस्वरुपी मुख्य जलसाक्षरता केंद्र आणि चंद्रपूर वन प्रशासन विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी, चंद्रपूर, जल व भूमी व्यवस्थापन संस्था (वाल्मी), औरंगाबाद व डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती येथे विभागीय जलसाक्षरता केंद्रे स्थापन करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**२.० जलसाक्षरता केंद्राची कार्यकक्षा व कार्यपध्दती**

जलसाक्षरता केंद्रामार्फत खालीलप्रमाणे प्रशिक्षण, संशोधन, अभ्यास व प्रलेखन, तसेच अनुषंगिक सहाय्यकारी कामे करण्यात यावीत.

**२.१ प्रशिक्षण**

(१) जलसाक्षरतेचा पाच वर्षाचा व वार्षिक प्रशिक्षण आराखडा तयार करणे.
(२) जलसाक्षरता विषयक प्रशिक्षणाच्या गरजांची निश्चिती करणे.
(३) प्रशिक्षणासाठी विविध मोड्यूल निश्चित करणे.
(४) विविध स्तरांवरील उत्स्फूर्त स्वयंसेवकांची (जलनायक, जलयोद्धा, जलप्रेमी, जलदूत, जलकर्मी व जलसेवक) निवड करणे.
(५) विविध पाणी वापरकर्ते/ लाभधारक/ जलनायक/ जलयोद्धा/ जलप्रेमी/ जलदूत/जलकर्मी / जलसेवक यांना प्रशिक्षण देणे.
(६) विभागीय जलसाक्षरता केंद्राच्या प्रशिक्षणाचे नियोजन करणे व मार्गदर्शन करणे.
(७) जलसाक्षरता अभियान व प्रशिक्षणासंबंधी वाचन साहित्य व प्रसार साहित्य तयार करणे.
(८) जलसाक्षरतेबाबत राज्यात विविध स्तरावर प्रशिक्षण व कार्यशाळा आयोजित करणे व त्यामध्ये मार्गदर्शन करणे.

**२.२ संशोधन,अभ्यास व प्रलेखन**

राज्यातील शासनामार्फत पूर्ण झालेले व बांधकामाधीन प्रकल्पांचे जलसाठे, जलसंधारणाची कामे, सिंचन प्रकल्प, लोकसहभागातून पूर्ण झालेल्या योजना व त्यांचा जनमानसावर झालेला परिणाम, पाण्याचे प्रदूषण व उपाययोजना, पाण्याचा पुनर्वापर याबाबत संदर्भ साहित्य निर्माण करणे व जनतेला सहजपणे उपलब्ध करुन देणे, त्यासाठी आवश्यक तिथे संकेत स्थळाचा वापर करुन जनतेला सहजपणे माहिती उपलब्ध करुन देणे, प्रशिक्षण व जलसाक्षरतेबाबत लघुपट/माहितीपट संबंधित

शासकीय यंत्रणेस उपलब्ध करुन देणे, सर्वसामान्य जनतेला समजेल अशा सोप्या भाषेतील तांत्रिक साहित्याची निर्मिती करणे, इत्यादी कामे करणे.

**२.३ जलसाक्षरता प्रसार व प्रसिध्दी :**

राज्यात जलसाक्षरता व जलजागृती निर्माण करण्यासाठी प्रसार प्रसिध्दीबाबतचे धोरण तयार करणे, त्यासाठी साहित्य निर्मिती करणे, प्रतिवर्षी शासनाच्या धोरणानुसार राज्यात जलजागृती सप्ताह राबविण्यासाठी प्रशिक्षण देणे व त्यासाठी आवश्यक साहित्य निर्मिती करणे इत्यादी.

**२.४ सहाय्यकारी कामे**

पाण्याच्या क्षेत्रात कार्यरत असेलेले शासनाचे विविध विभाग उदा. जलसंपदा विभाग/ जलसंधारण विभाग/ग्राम विकास विभाग/पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग/रोजगार हमी योजना/कृषि विभाग/नगर विकास विभाग/ उद्योग विभाग/पर्यावरण विभाग/शिक्षण विभाग इत्यादी विभागाच्या यंत्रणांना जलसाक्षरतेसंबंधी धोरणात्मक मार्गदर्शन करणे.

**३.० यशदा, पुणे येथील राज्यस्तरीय जलसाक्षरता केंद्राची रचना व पदांचा तपशील खालीलप्रमाणे राहील :**

| अ.क्र. | पदनाम | पद | संख्या |
|---|---|---|---|
| १. | संचालक, जल साक्षरता केंद्र, यशदा | सहयोगी / सहाय्यक प्राध्यापक | १ |
| २. | कार्यकारी संचालक | सहाय्यक प्राध्यापक / सहयोगी प्राध्यापक | १ |
| ३. | संशोधन अधिकारी(प्रलेखन) किंवा समकक्ष अधिकारी | संशोधन अधिकारी | २ |
| ४. | संशोधन अधिकारी(प्रशिक्षण) किंवा समकक्ष अधिकारी | संशोधन अधिकारी | ३ |
| ५. | संशोधन अधिकारी(माहिती, शिक्षण व संवाद) किंवा समकक्ष अधिकारी | संशोधन अधिकारी | १ |
| ६. | संशोधन सहायक किंवा समकक्ष अधिकारी | संशोधन सहायक | ४ |
| ७. | लिपिक टंकलेखक | | ३ |

जलसाक्षरता केंद्रातील संचालक व इतर अधिकारी/कर्मचारी ही पदे यशदा संस्थेच्या प्रचलित कार्यप्रणाली नुसार प्रतिनियुक्ती/करार तत्वावर भरण्याची कार्यवाही करावी.

**४.० विभागीय जलसाक्षरता केंद्राची रचना व पदांचा तपशील खालीलप्रमाणे राहील :**

| अ.क्र. | पदनाम | संख्या |
|---|---|---|
| १. | विभागीय संचालक | १ |
| २. | विभागीय कार्यकारी संचालक | १ |

| | | |
|---|---|---|
| ३. | प्रलेखन अधिकारी किंवा समकक्ष अधिकारी | १ |
| ४. | प्रशिक्षण अधिकारी किंवा समकक्ष अधिकारी | १ |
| ५. | प्रशिक्षण सहाय्यक किंवा समकक्ष अधिकारी | २ |
| ६. | प्रलेखन सहाय्यक किंवा समकक्ष अधिकारी | १ |
| ७. | लिपिक टंकलेखक | १ |

**५.० विभागीय जलसाक्षरता केंद्राचे कार्यक्षेत्र :**

| अ.क्र | जलसाक्षरता केंद्र / विभागीय केंद्र | कार्यक्षेत्र |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १. | यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे | पुणे, नाशिक आणि कोकण महसूल विभाग |
| २. | जल व भूमी व्यवस्थापन संस्था (वाल्मी), औरंगाबाद | औरंगाबाद महसूल विभाग |
| ३. | डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती | अमरावती महसूल विभाग |
| ४. | चंद्रपूर वन प्रशासन विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी, चंद्रपूर | नागपूर महसूल विभाग |

उपरोक्त विभागीय जलसाक्षरता केंद्रे ही त्या त्या महसूल विभागातून जलसाक्षरता विषयक कामांची अमलबजावणी यशदा या राज्यस्तरीय केंद्राच्या मार्गदर्शनाखाली करतील. यासंबधी यशदा स्तरीय जलसाक्षरता समितीकडून मार्गदर्शन करण्यात येईल व आवश्यकतेनुसार सूचना /निर्देश देण्यात येतील. त्याचे अनुपालन करणे विभागीय केंद्राला बंधनकारक असेल. विभागीय जलसाक्षरता केंद्राचे संचालक व इतर अधिकारी/कर्मचारी ही पदे त्या त्या संस्थेच्या प्रचलित कार्यप्रणालीनुसार व उपलब्ध निधीचा विचार करुन प्रतिनियुक्ती/करार तत्वावर भरण्याची कार्यवाही करण्यात यावी. तथापि, याबाबत उपलब्ध साधन सामुग्रीचा विचार करुन नियोजन करण्यात यावे.

**५.१** राज्यात जलसाक्षरता व जलजागृतीचे उपक्रम लोकसहभागातून व स्वयंस्फूर्तीने पुढे येणाऱ्या स्वयंसेवकाद्वारे राबविण्याचे शासनाचे धोरण आहे. त्यासाठी प्रशिक्षणाच्या माध्यमातून जलसेवक, जलनायक, जलयोद्धा, जलप्रेमी, जलदूत, व जलकर्मी, यांची संरचनात्मक फळी निर्माण करण्यात यावी.

**५.२ जलसेवक**

ग्रामस्तर व स्थानिक संस्था स्तरावर जलसाक्षरतेचे काम करणाऱ्या प्रशिक्षित व्यक्तीस "जलसेवक" असे संबोधण्यात यावे. प्रत्येक ग्राम पंचायत स्तरावर एक जलसेवक असेल.

**५.२.१. जलसेवकाचे कार्य :-**

(१) जलयुक्त शिवार अभियानाच्या अंमलबजावणीमध्ये तसेच सिंचन व्यवस्थापनाच्या कार्यान्वयनामध्ये योगदान देणे .

(२) जलसाक्षरता कार्यक्रमात स्थानिक स्तरावर सक्रीय सहभाग घेणे .

(३) ग्रामसभा/इतर सभांमध्ये जलसाक्षरतेबाबत माहिती देणे, जलसाक्षरतेविषयी विविध उपक्रमात सहभागी होऊन जलसाक्षरतेच्या प्रसारासाठी प्रयत्न करणे,

(४) शालेय महाविद्यालयीन व इतर स्तरावर जलसाक्षरतेच्या उपक्रमांमध्ये सहाय्य करणे .

(५) जलयुक्त शिवार अभियान अंतर्गत संबंधित ग्राम पंचायतीमधील गावांचे पाण्याचे अंदाजपत्रक तयार करण्यास आणि त्या ग्राम पंचायतीमधील गावांच्या समाप्ती निर्गमन )exit Protocol) प्रक्रियेमध्ये कृषि सहाय्यक / जलसंधारण सहायक/ संबंधित प्राधिकारी यांना सहाय्य करणे.

(६) आपल्या ग्राम पंचायत कार्यक्षेत्रात असलेल्या पाणी वापर संस्थांच्या प्रशिक्षणामध्ये शाखा अभियंता / सक्षम प्राधिकारी यांना सहाय्य करणे.

(७) जलसाक्षरतेच्या कार्यात जलकर्मी, जलदूत यांच्याशी समन्वय ठेवणे व प्रशिक्षणात सहभागी होणे; आपल्या ग्राम पंचायतीशी निगडित जलसाक्षरता विषयक बाबींसाठी तालुका स्तरीय समितीच्या सूचना व मार्गदर्शनानुसार कामकाज करणे.

(८) जलसेवकाने स्वत:चे काम सांभाळून स्वयंप्रेरणेने, उत्स्फूर्तपणे व सामाजिक बांधिलकी म्हणून काम करावयाचे असून त्यास कोणतेही मानधन देण्यात येणार नाही

(९) जलसेवकास विनामूल्य प्रशिक्षण देण्यात येईल व प्रशिक्षण कालावधीत प्रवास खर्च देण्यात येईल.

(१०) जलसेवकाने केलेल्या कामांची नोंद संबंधित ग्रामपंचायतीने ठेवावी.

**५.२.२. जलसेवकासाठी अर्हता व निवड:**

**अअर्हता.-:**

(१) जलसेवक हा लिहिता वाचता येणारा व जीवनात उच्च मूल्ये जोपासणारा आणि त्याग व राष्ट्रभावनेने प्रेरित असावा .

(२) जलसेवक हा ग्रामसभेचा सदस्य असावा व त्याच्या नामनिर्देशनास ग्रामसभेची मान्यता असावी .

(३) शासनाच्या विविध विकास उपक्रमांविषयी जाणकार अशी व्यक्ती; स्वच्छता दूत , स्वयंसहाय्यता गटातील उत्कृष्ट काम केलेल्या महिला ,सामाजिक कार्यकर्ते, राष्ट्रीय सेवा योजनेतील स्वयंसेवक, पाणलोट क्षेत्रात उत्कृष्ट काम केलेल्या व्यक्ती, पाणी वापर संस्थांमध्ये कार्य केलेल्या व्यक्ती, सामाजिक बांधिलकी म्हणून काम करणा-या व्यक्ती, स्वयंस्फूर्तीने पुढे येणारे नागरीक, अशा व्यक्तींमधून नामनिर्देशन करण्यात यावे.

**ब. नामनिर्देशन-:**

(१) ग्रामसभेने ग्रामसेवकाद्वारे प्रत्येक ग्रामपंचायतीमध्ये जलसेवकाचे नामनिर्देशन करण्यासाठी लेखी अर्ज मागवावेत. याकरीता दवंडी, जाहीर निवेदन इत्यादींचा अवलंब करावा.

(२) जलसेवकाचे नामनिर्देशन करावयाच्या वेळी त्या ग्रामसभेमध्ये संबंधित तालुक्यातील कोणत्याही जलदूतास मार्गदर्शनासाठी बोलाविण्यात यावे.

(३) ग्राम पंचायतीने छाननी केलेली यादी ग्रामसभेसमोर ठेवावी .

(४) ग्रामसभेने एका व्यक्तीस जलसेवक म्हणून नामनिर्देशित करावे.

(५) जलसेवकाबाबत अधिक तपशीलवार मार्गदर्शक सूचना आवश्यकतेनुसार वेगळ्याने निर्गमित करण्यात येतील.

**५.३ जलकर्मी**

पाण्याबाबतचे उपक्रम राबविणारे शासनाच्या तसेच शासनास सहाय्यकारी संस्थांतील व विविध विभागांचे जनतेशी थेट संपर्क असणारे प्रशिक्षित निवडक क्षेत्रीय कर्मचारी/ अधिकारी तसेच काम करण्यास इच्छुक असणारे व निवड केलेले शासकीय सेवेतून सेवा निवृत्त अधिकारी/कर्मचारी यांना जलकर्मी असे संबोधण्यात यावे. प्रत्येक जिल्ह्यामध्ये जलकर्मींची संख्या ३० एवढी असेल. सदर जलकर्मींचा जिल्हास्तरावर संच करण्यात यावा. जलकर्मी हे विविध स्तरावरील स्वयंसेवकांच्या फळीला तांत्रिक सहाय्य व मार्गदर्शन करतील. त्यांना जलसाक्षरता व जलजागृतीचे आवश्यक प्रशिक्षण जलसाक्षरता केंद्रामार्फत देण्यात येईल.

**५.४ जलनायक व विविध स्तरावरील संरचनात्मक फळी :**

जलनायक व विविध स्तरावरील संरचनात्मक फळी तयार करताना विविध स्तरांवर प्रशिक्षण देण्याचा व जलक्षेत्रातील कामाचा अनुभव असणाऱ्या प्रशिक्षकांची निवड करून त्यांना त्यांच्या कार्यक्षेत्राच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे संबोधण्यात येईल. राज्यस्तरावर जलनायक; विभाग स्तरावर जलयोद्धा; जिल्हा स्तरावर जलप्रेमी तसेच तालुका स्तरावर जलदूत असे संबोधण्यात येईल. विविध स्तरावरील प्रशिक्षकांची संख्या पुढीलप्रमाणे असेल: राज्यस्तर जलनायक २४ (प्रत्येक विभागातून ४ प्रमाणे), विभागस्तर जलयोद्धा ४८ (प्रत्येक विभागातून ८ प्रमाणे), जिल्हास्तर जलप्रेमी ३४० (प्रत्येक जिल्ह्यातून १०), तालुका स्तर जलदूत ३५१० (प्रत्येक तालुक्यास १० प्रमाणे). या संख्येमध्ये आवश्यकतेनुसार बदल करणे, संरचनात्मक फळीमधील विविध स्तरावरील उत्स्फूर्त स्वयंसेवकांची कार्यकक्षा निश्चित करणे, त्यांच्या निवडीचे निकष ठरविणे याबाबतची कार्यवाही संबंधित जलसाक्षरता केंद्राकडून करण्यात यावी. विविध स्तरावरील प्रशिक्षकांना तसेच जलसेवकांना व जलकर्मींना मार्गदर्शन करणे असे प्रशिक्षणासह कामकाज देखील करण्यात येईल.

५.५ वरील प्रमाणे राज्यस्तर ते तालुका स्तरापर्यंतच्या फळीचे निवडीचे निकष, त्यांची संख्या व कार्यपध्दती याबाबत आवश्यकतेनुसार यशदा, पुणे यांच्याकडून वेळोवेळी मार्गदर्शक सूचना देण्यात येतील.

**६.० समन्वय**

राज्यात जलजागृती व जलसाक्षरता यासाठी राबविल्या जाणाऱ्या विविध उपक्रमांचे समन्वय करण्यासाठी विविध स्तरांवर खालीलप्रमाणे समित्या स्थापन करण्यात येत आहेत.

| अ.क्र | समन्वय समिती | अध्यक्ष | रचना |
|---|---|---|---|
| १. | राज्यस्तरीय जलसाक्षरता समिती | सचिव (लाक्षेवि) | परिशिष्ट “अ” नुसार |
| २. | यशदा स्तरीय जलसाक्षरता समिती | उप महासंचालक, यशदा | परिशिष्ट “ब” नुसार |
| ३. | विभाग स्तरीय जलसाक्षरता समिती | विभागीय आयुक्त | परिशिष्ट “क॰ नुसार |
| ४. | जिल्हास्तरीय जलसाक्षरता समिती | जिल्हाधिकारी | परिशिष्ट “ड” नुसार |
| ५. | तालुकास्तरीय जलसाक्षरता समिती | तहसिलदार | परिशिष्ट “इ” नुसार |

**६.१ राज्यस्तरीय जलसाक्षरता समितीची कार्यकक्षा**

(१) विविध विभागातील जलसाक्षरतेबाबतचे विषय, धोरणे व अडचणी बाबत निर्णय घेणे.
(२) जलसाक्षरतेबाबतची प्रचार व प्रसिध्दीसाठी माध्यमे व धोरण ठरवणे.
(३) संशोधन,अभ्यास आणि प्रलेखनाचा आढावा घेणे.
(४) सर्वसाधारणपणे राज्यस्तरीय समन्वय समितीची बैठक वर्षातून दोन वेळा घेण्यात यावी.

**६.२ यशदा स्तरावरील जलसाक्षरता समितीची कार्यकक्षा**

(१) राज्यस्तरीय जलसाक्षरता समितीकडून प्राप्त होणाऱ्या निर्देशांची अंमलबजावणी करण्यासाठी नियोजन करणे.
(२) जलसाक्षरता केंद्राच्या कार्यक्षेत्रातील कामकाज यासाठी आवश्यकतेनुसार निर्णय घेणे, विविध कार्यक्रमांचे कार्यान्वयन व संनियंत्रण करणे व संबंधितांना आवश्यकतेनुसार मार्गदर्शन करणे
(३) राज्यस्तरीय जलसाक्षरता केंद्र व विभागीय जलसाक्षरता केंद्राच्या प्रशिक्षण आराखडयास मान्यता देऊन राबविणे; जलसाक्षरता केंद्राच्या कार्यक्षेत्रातील कामकाजाचा वेळोवेळी आढावा घेणे व त्याबाबत संबंधिताना मार्गदर्शन करणे; प्रशिक्षण कार्यक्रमाच्या नियोजनाचा तसेच प्रत्यक्ष अंमलबजावणीचा आढावा घेणे.
(४) जलनायक व जलयोद्धा यांची निवड करणे, त्यात बदल करणे, निवड रद्द करणे, इत्यादी.
(५) यशदा स्तरावरील जलसाक्षरता समितीच्या वर्षातून किमान दोन बैठका घेण्यात याव्यात.

**६.३ विभाग स्तरीय जलसाक्षरता समितीची कार्यकक्षा**

(१) विभागीय जलसाक्षरता केंद्राच्या प्रशिक्षणाचे नियोजन व अंमलबजावणी
(२) राज्य आणि यशदा स्तरीय समिती कडील सूचनांप्रमाणे कार्यवाही करणे; जिल्हा स्तरीय व तालुका स्तरीय जलसाक्षरता समितीस मार्गदर्शन करणे.
(३) विभागीय जलसाक्षरता केंद्राच्या कामाचा आढावा, विभागीय जलसाक्षरता केंद्रांचे आणि समस्यांचे निराकरण.
(४) जलप्रेमी यांची निवड करणे व त्यांचा आढावा घेणे, जलनायक ते जलसेवक या फळीतील स्वयंसेवकांना आवश्यकतेनुसार मार्गदर्शन करणे.
(५) विभाग स्तरावरील जलसाक्षरता समितीच्या वर्षातून किमान दोन बैठका घेण्यात याव्यात.

## ६.४ जिल्हास्तरीय जलसाक्षरता समिती

(१) जिल्ह्यातील वर्षभरातील जलसाक्षरता कार्यक्रमाचा आराखडा व अहवालाचा आढावा घेऊन अंतिम करणे.
(२) जलजागृती कार्यक्रम उदा. जलजागृती, वृक्षारोपण, इत्यादी कार्यक्रमांचे नियोजन व अंमलबजावणीमध्ये सहाय्य करणे.
(३) जिल्ह्यातील जलसाक्षरता विषयाशी संबंधित तज्ञ, अशासकीय / शासकीय व्यक्ती, स्वयंसेवी संस्था यांची माहिती संकलित करुन विभागीय जलसाक्षरता केंद्रास देणे.
(४) जलप्रेमी यांच्या निवडीसाठी विभागीय जलसाक्षरता केंद्रास साहाय्य करणे तसेच जलकर्मी व जलदूत यांची निवड करणे, त्यात बदल करणे,रद्द करणे इ.
(५) जलकर्मी, जलप्रेमी, जलदूत, जलसेवक यांच्या प्रशिक्षणाच्या गरजा, विषय, अडचणी विभागीय जलसाक्षरता केंद्रास कळविणे.
(६) ग्रामपंचायत/ग्रामसभा यांच्याकडून जलसेवकांच्या निवडीच्या प्रक्रियेचा व कामकाजाचा आढावा घेऊन मार्गदर्शन करणे.
(७) जिल्हास्तरीय जलसाक्षरता समितीच्या बैठका प्रत्येक तीन महिन्यातून किमान एकदा घेण्यात याव्यात

## ६.५ तालुकास्तरीय जलसाक्षरता समितीची कार्यकक्षा

(१) ग्रामपंचायत/ग्रामसभा यांच्याकडून जलसेवकांची निवड आवश्यकतेनुसार जलदूतांकरवी पूर्ण करणे; निवड प्रक्रियेचा आढावा घेणे व त्यास मार्गदर्शन करणे, जलसेवकांच्या कार्याचे मूल्यमापन करणे.
(२) जलदूतांचे/जलकर्मींचे प्रस्ताव जिल्हा स्तरीय जलसाक्षरता समितीकडे पाठविणे.
(३) जलसेवकांच्या कामांचे संनियंत्रण करणे.
(४) वेळोवेळी होणाऱ्या प्रशिक्षणाचा आढावा घेणे.
(५) शासनाच्या विविध विभागाच्या जलविषयक कार्यक्रम/उपक्रमामध्ये समन्वय ठेवणे.
(६) पाणी वापर संस्थांशी समन्वय करुन त्यांचे क्षमता बांधणीसाठी प्रयत्न करणे.
(७) सदर समितीची बैठक महिन्यातून किमान एकदा घेण्यात यावी.

## ७.० जल साक्षरता केंद्रासाठी निधी :-

जलसाक्षरता राज्यस्तरीय केंद्र व विभागीय केंद्रासाठी आवश्यक निधी जलसंपदा विभागाकडून मागणीनुसार यशदा पुणे यांचेकडे वेळोवेळी वर्ग करण्यात येईल. सदर निधीचे विनियोग यशदाच्या कार्यप्रणालीनुसार करण्यात यावा. लेखा परीक्षण आणि इतर वित्तीय बाबी यशदाच्या मानकानुसार असतील. जलसाक्षरता केंद्र व विभागीय जलसाक्षरता केंद्र यांच्या जलसाक्षरताविषयक कामकाजावर यशदाचे प्रशासकीय नियंत्रण राहील.

८.० जलसाक्षरता केंद्र व विभागीय जलसाक्षरता केंद्र यांच्या कामकाजाबाबत आवश्यकतेनुसार सविस्तर मार्गदर्शक सूचना जलसंपदा विभाग/यशदाकडून निर्गमित करण्यात येतील.

९.० जलजागृती व जलसाक्षरतेचे उत्कृष्ट काम करणाऱ्या जलनायक, जलयोद्धा, जलप्रेमी, जलदूत, जलकर्मी व जलसेवकांचा प्रतिवर्षी गौरव करण्यात येईल. त्याबाबत ची प्रणाली यशदाने निश्चित करावी.

१०.० जलजागृती व जलसाक्षरतेचे काम जलनायक, जलयोद्धा, जलप्रेमी, जलदूत, जलकर्मी व जलसेवकांनी स्वयंस्फूर्तीने सामाजिक बांधिलकीतून करावयाचे असल्याने त्याबद्दल त्यांना कोणताही मोबदला अथवा आर्थिक मानधन दिले जाणार नाही. प्रशिक्षण कार्यक्रमांमध्ये सहभागी होण्यासाठी संरचनात्मक फळीतील सदर घटकांना प्रचलित पद्धतीनुसार प्रत्यक्ष प्रवास खर्च देण्यात येईल.

११.० सदरचा शासन निर्णय साप्रविच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २९/१६, दि.१९/०८/२०१६ तसेच वन विभाग, जल व मृद संधारण विभाग, नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

१२.०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८०९१९१७१७३७६४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Atul Ashok Kapole

Digitally signed by Atul Ashok Kapole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=797fcfe0bb4a86dd814129f50d05c1d249ea6f0acc364c6214f11ff7174bd5ef, serialNumber=ae2c4f4c985d3e984de94324901263d48766ec651dea49d652faf11a96aa98b5, cn=Atul Ashok Kapole
Date: 2018.09.19 17:23:11 +05'30'

(अ.अ. कपोले)
उपसचिव (जलसंपदा)

सोबत : परिशिष्ट अ, ब क, ड, व इ

**प्रत**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. सर्व विधानसभा सदस्य/ विधान परिषद सदस्य
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. सर्व अ.मु.स./प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई
७. महासंचालक, यशदा, पुणे
८. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई
९. सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग

१०. सर्व विभागीय आयुक्त
११. शिक्षण संचालक, पुणे.
१२. सदस्य सचिव महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ
१३. महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था (वाल्मी), औरंगाबाद
१४. महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था (मेरी), नाशिक
१५. संचालक, डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती
१६. संचालक, चंद्रपूर वन प्रशासन विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी, चंद्रपूर.
१७. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,
१८. मुख्य कार्यकारी अधिकारी, नवी मुंबई,
१९. सर्व जिल्हाधिकारी
२०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
२१. सर्व प्रकल्प संचालक जिल्हाग्रामीण विकास यंत्रणा,
२२. सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी
२३. संबंधीत समिती सदस्य, राज्यस्तरीय जलसाक्षरता समिती
२४. संबंधित समिती सदस्य, यशदा स्तरीय जलसाक्षरता समिती
२५. संबंधित समिती सदस्य, विभाग स्तरीय जलसाक्षरता समिती
२६. संबंधित समिती सदस्य, जिल्हा स्तरीय जलसाक्षरता समिती
२७. संबंधित समिती सदस्य, तालुका स्तरीय जलसाक्षरता समिती
२८. सर्व अधीक्षक अभियंता, (सिंचन व्यवस्थापन )जलसंपदा विभाग
२९. सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
३०. सर्व सह सचिव/ अवर सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
३१. अवर सचिव/ कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३२. निवड नस्ती.

शासन निर्णय, क्र. वाल्मी-२०१६/प्र.क्र.६९/१६ लाक्षेवि (आस्था), दि. ३० नोव्हेंबर, २०१६ चे

**सहपत्र**

**परिशिष्ट अ**

**१. राज्यस्तरीय जलसाक्षरता समितीची रचना**

| | | |
|---|---|---|
| १. | सचिव ( लाक्षेवि) | अध्यक्ष |
| २. | महासंचालक, यशदा | सहअध्यक्ष |
| ३. | महासंचालक, (वाल्मी) | सदस्य |
| ४. | विभागीय आयुक्त (सर्व) | सदस्य |
| ५. | उपमहासंचालक यशदा तथा अध्यक्ष यशदा स्तरीय समिती | सदस्य |
| ६. | आयुक्त, कृषि पुणे | सदस्य |
| ७. | आयुक्त, मृद व जलसंधारण, औरंगाबाद | सदस्य |
| ८. | सहसचिव, (वने) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ९. | उपसचिव (प्रशिक्षण) सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| १०. | उपसचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ११. | उपसचिव, जलसंधारण/रोजगार हमी योजना, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| १२. | उपसचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| १३. | उपसचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| १४. | उपसचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| १५. | उपसंचालक, नगरपालिका प्रशासन | सदस्य |
| १६. | सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ | सदस्य |
| १७. | संचालक/कार्यकारी संचालक, जलसाक्षरता केंद्र, यशदा | सदस्य |
| १८. | संचालक/ उपसंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग | सदस्य |
| १९. | शासनाने नामनिर्देशित केलेले दोन अशासकीय सदस्य (या क्षेत्रात उल्लेखनीय काम केलेली व्यक्ती/तज्ञ | सदस्य |
| २०. | नामनिर्देशित केलेले दोन जलनायक (यशदा जलसाक्षरता केंद्राने नामनिर्देशित करावयाचे) | सदस्य |
| २१. | उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य- सचिव |

शासन निर्णय, क्र. वाल्मी-२०१६/प्र.क्र.६९/१६ लाक्षेवि (आस्था), दि. ३० नोव्हेंबर, २०१६ चे

**सहपत्र**

**परिशिष्ट ब**

## २. यशदा स्तरीय जलसाक्षरता समितीची रचना

| | | |
|---|---|---|
| १. | उपमहासंचालक, यशदा | अध्यक्ष |
| २. | उप आयुक्त, मृद व जलसंधारण, औरंगाबाद | सदस्य |
| ३. | उप आयुक्त, कृषि, पुणे | सदस्य |
| ४. | उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय मुंबई | सदस्य |
| ५. | प्रादेशिक अधिकारी, प्रदुषण नियंत्रण महामंडळ, पुणे | सदस्य |
| ६. | संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा | सदस्य |
| ७. | संचालक, राग्राविसं-यशदा | सदस्य |
| ८. | अध्यक्ष, जैवविविधता मंडळ, महाराष्ट्र राज्य , नागपूर | सदस्य |
| ९. | संचालक, मृद व जलसंधारण, पुणे | सदस्य |
| १०. | कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळ (सर्व) | सदस्य |
| ११. | उपसचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| १२. | विभागीय संचालक, विभागीय जलसाक्षरता केंद्र (सर्व) | सदस्य |
| १३. | उपसचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| १४. | संचालक, शिक्षण (प्राथमिक) | सदस्य |
| १५. | संचालक, शिक्षण (माध्यमिक) | सदस्य |
| १६. | अपर मुख्य कार्यकारी अधिकारी, वसुंधरा, पुणे | सदस्य |
| १७. | मुख्य अभियंता महाराष्ट्र जीवन विकास प्राधिकारी, पुणे | सदस्य |
| १८. | शासनाने नामनिर्देशित केलेले दोन अशासकीय सदस्य (या क्षेत्रात उल्लेखनीय काम केलेली व्यक्ती/तज्ञ) | सदस्य |
| १९. | यशदा जलसाक्षरता केंद्राने नामनिर्देशित केलेले दोन जलनायक | सदस्य |
| २०. | संचालक, जलसाक्षरता केंद्र, यशदा | सदस्य |
| २१. | कार्यकारी संचालक, जलसाक्षरता केंद्र, यशदा | सदस्य सचिव |

शासन निर्णय, क्र. वाल्मी-२०१६/प्र.क्र.६९/१६ लाक्षेवि (आस्था), दि. ३० नोव्हेंबर, २०१६ चे

**सहपत्र**

**परिशिष्ट क**

**विभाग स्तरीय जलसाक्षरता समितीची रचना**

| | | |
|---|---|---|
| १. | विभागीय आयुक्त | अध्यक्ष |
| २. | मुख्य वन संरक्षक | सदस्य |
| ३. | कार्यकारी संचालक (त्या विभागातील खोरे विकास महामंडळ) | सदस्य |
| ४. | मुख्य अभियंता जलसंधारण विभाग | सदस्य |
| ५. | प्रादेशिक संचालक प्रदूषण नियंत्रण मंडळ. | सदस्य |
| ६. | उपसंचालक शिक्षण (माध्यमिक) | सदस्य |
| ७. | उपसंचालक शिक्षण (प्राथमिक) | सदस्य |
| ८. | वरिष्ठ भू वैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा (विभागीय अधिकारी) | सदस्य |
| ९. | विभागीय कृषि संचालक | सदस्य |
| १०. | सहसंचालक, सामाजिक वनीकरण | सदस्य |
| ११. | यशदा स्तरीय समितीने नामनिर्देशित केलेले जलयोद्धा (विभागस्तर), जलप्रेमी (जिल्हास्तर) प्रत्येकी एक. | सदस्य |
| १२. | मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण | सदस्य |
| १३. | संचालक, विभागीय जलसाक्षरता केंद्र | सदस्य |
| १४. | कार्यकारी संचालक, विभागीय जलसाक्षरता केंद्र (नाशिक, कोंकण आणि पुणे विभागासाठी यशदा जलसाक्षरता केंद्राने नामनिर्देशित केलेले अधिकारी) | सदस्य |
| १५. | उपायुक्त (रो.ह.यो.), विभागीय आयुक्त कार्यालय | सदस्य |
| १६ | उपायुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय | सदस्य सचिव |

टिप:- विभागीय स्तरावरील बैठकीचे आयोजन व नियंत्रण याबाबतची कार्यवाही उपायुक्त (विकास) विभागीय आयुक्त कार्यालय यांनी नियमितपणे करावी.

शासन निर्णय, क्र. वाल्मी-२०१६/प्र.क्र.६९/१६ लाक्षेवि (आस्था), दि. ३० नोव्हेंबर, २०१६ चे

**सहपत्र**

**परिशिष्ट ड**

**१. जिल्हा स्तरीय जलसाक्षरता समितीची रचना**

| | | |
|---|---|---|
| १. | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २. | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | सहअध्यक्ष |
| ३. | उप जिल्हाधिकारी (रोहयो) | निमंत्रक |
| ४. | जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी | सदस्य |
| ५. | कार्यकारी अभियंता, लघुपाटबंधारे (जलसंधारण) | सदस्य |
| ६. | शिक्षणाधिकारी, जिल्हापरिषद (प्राथमिक) | सदस्य |
| ७. | शिक्षणाधिकारी, जिल्हापरिषद (माध्यमिक) | सदस्य |
| ८. | प्रकल्प संचालक, जि.ग्रा.वि.यं. | सदस्य |
| ९. | विभागीय संचालक, विभागीय जल साक्षरता केंद्र औरंगाबाद/ अमरावती / चंद्रपूर | सदस्य |
| १०. | यशदा जलसाक्षरता केंद्राचे प्रतिनिधी-पुणे/ नाशिक / कोकण विभागाकरिता | सदस्य |
| ११. | कार्यकारी अभियंता, लघुपाटबंधारे, जिल्हा परिषद | सदस्य |
| १२. | उप संचालक, सामाजिक वनीकरण | सदस्य |
| १३. | उपवनसंरक्षक | सदस्य |
| १४. | वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा | सदस्य |
| १५. | कार्यकारी अभियंता (ग्रा पा पू) | सदस्य |
| १६. | कार्यकारी अभियंता (म. जि. प्रा) | सदस्य |
| १७. | मा. पालकमंत्री यांनी नामनिर्देशित केलेले जिल्हयातील एक जलप्रेमी व एक जलदूत, (अनुक्रमे विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांचे निवड समितीने निवड केलेल्या पैकी) | सदस्य |
| १८. | मा. पालकमंत्री यांनी नामनिर्देशित केलेले जिल्ह्यातील दोन जलसेवक (ग्रामसभेने नामनिर्देशित केलेल्या पैकी) | सदस्य |
| १९ | कार्यकारी अभियंता, (सिंचन व्यवस्थापन), जलसंपदा विभाग (एकाच मुख्यालयी एकापेक्षा अधिक का.अ. असल्यास कार्यकारी संचालक पाटबंधारे महामंडळ हे ठरवतील) | सदस्य सचिव |

**टिप:-** जिल्हास्तरीय बैठकीचे आयोजन व नियंत्रक याबाबतची कार्यवाही उपजिल्हाधिकारी, रोजगार हमी योजना यांनी नियमितपणे करावी.

शासन निर्णय, क्र. वाल्मी-२०१६/प्र.क्र.६९/१६ लाक्षेवि (आस्था), दि. ३० नोव्हेंबर, २०१६ चे

**सहपत्र**

**परिशिष्ट इ**

२. **तालुका स्तरीय जलसाक्षरता समितीची रचना**

| | | |
|---|---|---|
| १. | संबधित उपविभागीय अधिकारी (प्रांत अधिकारी) | अध्यक्ष |
| २. | तहसीलदार | सहअध्यक्ष व निमंत्रक |
| ३. | गट विकास अधिकारी | सहअध्यक्ष्य |
| ४. | गट शिक्षणाधिकारी | सदस्य |
| ५. | तालुका कृषि अधिकारी | सदस्य |
| ६. | वन परिक्षेत्र अधिकारी | सदस्य |
| ७. | लागवड अधिकारी (सामाजिक वनीकरण) | सदस्य |
| ८. | उपअभियंता (लपा) जिल्हा परिषद | सदस्य |
| ९. | उपअभियंता (स्थानिकस्तर) | सदस्य |
| १०. | उप अभियंता ग्रा पा पु | सदस्य |
| ११. | जिल्हाधिकारी यांनी नामनिर्देशित केलेले जलदूत (तालुकास्तर) ४ | अशासकीय सदस्य |
| १२. | उपविभागीय अधिकारी यांनी नामनिर्देशित केलेले जलसेवक (ग्रामपंचायत स्तर)४ | अशासकीय सदस्य |
| १३. | उपअभियंता, जलसंपदा | सदस्य सचिव |

**टिप:-** तालुकास्तरीय बैठकीचे आयोजन व नियंत्रण याबाबतची कार्यवाही तहसीलदार यांनी नियमितपणे करावी.